महाराष्ट्र शासन

**क्र : सेप्रप-२०२४/प्र.क्र.४१/विभाप**
**सामान्य प्रशासन विभाग,**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दूरध्वनी क्र.२२७९३६९२
दिनांक :- २१ एप्रिल, २०२५.

**प्रति,**

उप/सह सचिव (आस्थापना),
सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

**विषय :-** सहायक कक्ष अधिकारी सेवाप्रवेशोत्तर प्रशिक्षण परीक्षा २०२५ व कक्ष अधिकारी विभागीय परीक्षा २०२५ च्या एकत्रित प्रशिक्षणाच्या कालावधीबाबत....

**संदर्भ :-** उपअभियंता, दक्षिण (सा.बां.) उपविभाग, मुंबई यांचे दि. १७.०४.२०२५ रोजीचे पत्र.

महोदय/महोदया,

सामान्य प्रशासन विभागाच्या दि. २१.०३.२०२५ रोजीच्या परिपत्रकान्वये, सहायक कक्ष अधिकारी सेवाप्रवेशोत्तर प्रशिक्षण परीक्षा २०२५ व कक्ष अधिकारी विभागीय परीक्षा २०२५ या दोन्ही परीक्षांच्या एकत्रित प्रशिक्षण वर्गाचे आयोजन सोमवार दि. ०७ एप्रिल, २०२५ ते दि. २३ मे, २०२५ या कालावधीत परिषद सभागृह,६ वा मजला, मंत्रालय विस्तार इमारत, मुंबई येथे करण्यात येणार असल्याबाबत कळविण्यात आले होते.

तथापि, संदर्भाधिन दि. १७.०४.२०२५ रोजीच्या पत्रान्वये उपअभियंता, दक्षिण (सा.बां.) उपविभाग, मुंबई यांनी उपरोक्त परिषद सभागृहाचे नूतनीकरण करण्यात येणार असल्याचे कळविले आहे. परिणामी, दि. २१.०४.२०२५ ते दि. २.०५.२०२५ या कालावधीदरम्यान परिषद सभागृह नूतनीकरणामुळे, तसेच दि. ५.५.२०२५ ते दि. ९.५.२०२५ या कालावधीदरम्यान आयोजित करण्यात आलेल्या Tech वारी (Learning week) मुळे परिषद सभागृह प्रशिक्षणासाठी उपलब्ध होऊ शकत नसल्याने विषयांकीत प्रशिक्षण पुढे ढकलण्यात येत आहे. प्रशिक्षणाचे सुधारित वेळापत्रक लवकरच शासनाच्या संकेतस्थळावर प्रसिद्ध करण्यात येईल.

सदर पत्राची प्रत महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आली असून त्याचा संकेतांक २०२५०४२११८१३०६०८०७ असा आहे. हे पत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

आपली

SMITA PRASAD JOSHI

Digitally signed by SMITA PRASAD JOSHI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT,
2.5.4.20=d759e39e5163375d3782e5f6bef7edf6a25c72797123cdaa86acd09edf52baf1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=28AA5752FA66D3A7FDEAFB1F4AB24CD90FD9D667A6880CB8CCECA18276150ACA, cn=SMITA PRASAD JOSHI
Date: 2025.04.21 18:40:15 +05'30'

**( स्मिता जोशी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. श्रीमती गीता कुलकर्णी, सह सचिव, सामान्य प्रशासन विभाग.

२. उप सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग
३. श्रीमती वैशाली सुळे, उप सचिव वै.शि. व औ. द्रव्ये विभाग
४. श्री. ना.रा. थिटे, उप सचिव, विधानमंडळ सचिवालय
५. श्रीमती माधवी शिंदे, अवर सचिव,सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग
६. श्री. आ.अ.लोपिस, सेवानिवृत्त अवर सचिव,सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग
७. श्रीमती गीता यादव, कक्ष अधिकारी,विधि व न्याय विभाग
८. श्री. सचिन राणे, कक्ष अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग
९. श्रीमती अमृता मनवे, कक्ष अधिकारी, कृषि व पदुम विभाग
१०.श्री. संदीप जाधव, सहायक कक्ष अधिकारी, सार्वजनिक बांधकाम विभाग
११.निवडनस्ती.